स्पर्श ग्रामीण रूग्णालय, सास्तुर, जि. उस्मानाबाद या संस्थेस अनुदान मंजूर करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः प्राईड-२०२०/ प्र.क्र.१०३/ आरोग्य-४**

मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख : २१ डिसेंबर, २०२०.

वाचा :-

**(१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग., क्रमांकः आरएलएच-२७९६/१४५२/प्र.क्र.२४६/ आरोग्य-४, दि.२६.०६.२०००.**

**(२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग., क्रमांकः प्राईड-२०१०/ प्र.क्र.९९/ आरोग्य-४, दि.२३.०९.२०१२.**

**(३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग., क्रमांकः प्राईड-२०१०/ प्र.क्र.९९/ आरोग्य-४, दि.३१.०१.२०१९.**

**(४) सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये ( राज्यस्तर ), मुंबई यांचे पत्र, क्रमांकः संआसे /कक्ष३/ टे-२/ग्रारु सास्तुर/२७५६-५८/२०, दि.१६.०३.२०२०.**

प्रस्तावना :-

स्पर्श ग्रामीण रुग्णालय, सास्तूर, जि. उस्मानाबाद या रुग्णालयास सद्या अनुज्ञेय असलेल्या सहाय्यक अनुदानात रु.७१.९६ लाख इतकी वाढ करण्यास व एकूण रु.१२५.०० लाख इतके सहाय्यक अनुदान दि.१ जानेवारी, २०१९ पासून प्रतिवर्षी देण्यास, उपरोक्त क्र.(१) व (२) येथील दि.२६.०६.२००० व दि.२३.०९.२०१२ च्या शासन निर्णयांमधील अटी व शर्तीच्या अधिन राहून उपरोक्त क्र.(३) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. स्पर्श ग्रामीण रुग्णालय, सास्तूर, जि. उस्मानाबाद या संस्थेकरीता सन २०१८-१९ या वर्षाचे अनुदान मंजूर करण्याबाबतचा आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

शासन निर्णय :-

स्पर्श ग्रामीण रुग्णालय, सास्तूर, जि. उस्मानाबाद या संस्थेस सन २०१८-१९ या वर्षाकरीता रु.७१.०१ लक्ष इतके सहायक अनुदान अनुज्ञेय आहे. संस्थेकडे सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील रु.६६.९६ लक्ष इतके अनुदान शिल्लक होते. यास्तव सदर संस्थेस रु.०४.०५ लक्ष फक्त ( रु.७१.०१ लक्ष - रु.६६.९६ लक्ष =रु.०४.०५ लक्ष) (रुपये चार लक्ष पाच हजार फक्त) इतके अनुदान अदा करण्यास

उपरोक्त क्र.(१) व (२) येथील दि.२६.०६.२००० व दि.२३.०९.२०१२ च्या शासन निर्णयांमधील अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्रमांक - आर-१, मुख्यलेखाशिर्ष "२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१ - नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा ग्रामीण आरोग्य सेवा, ११० - रुग्णालये व दवाखाने, ११० (४) - मुफसल रुग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदान, (०३)(०१) अध्यापनेतर रुग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदान (२२१० ०१७३), ३१ - सहाय्यक अनुदाने" या लेखाशीर्षांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत तरतूद उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर यांच्या अधिनस्त ठेवण्याबाबतची कार्यवाही सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थसंकल्प व प्रशासन ), पुणे यांनी करावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील भाग-पहिला, उपविभाग-तीन मधील अनुक्रमांक ४, परिच्छेद क्र.२७ (२) (ब) अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२२११४०१८९०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra,
2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b,
serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2020.12.21 12:40:23 +05'30'

**प्र.मो.बलकवडे**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (कुटूंब कल्याण, माता बालसंगोपन व शालेय आरोग्य),पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.

५. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ), पुणे.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर.
८. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, उस्मानाबाद.
१०.प्रकल्प अधिकारी, प्राईड इंडिया स्पर्श ग्रामीण रूग्णालय, सास्तुर, ता.लोहारा, जि.उस्मानाबाद.
११.वित्त विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई.
१२.अवर सचिव (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१३.निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.